**तेलंग स्मारक मुलींचे वसतिगृह मुंबई या वसतिगृह इमारत दुरुस्ती व नुतनीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र. प्रशामा-२०२४/प्र.क्र.१६३/मशि-३,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १४ फेब्रुवारी,२०२५.

**संदर्भ** :- १) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.अंर्थस २०२४/(१४०/२४/२४)/E-९५७४७६/विद्युत दुरुस्ती/लेखा-२, दिनांक ०२.१२.२०२४

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे पत्र क्र. मु.अ (मुं)/विद्युत/९५३/सन २०२४, ३१.०७.२०२४ दिनांक

**प्रस्तावना** :-

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भिय १) येथील दिनांक ०२.१२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये तेलंग स्मारक मुलींचे वसतिगृह, मुंबई या वसतिगृहातील निवासी खोल्या, कॅन्टिन, पॅसेज, स्वच्छतागृह येथील उपकरणे नादुरुस्त आहेत. याचे दुरुस्ती व नुतणीकरण करणे आवश्यक आहे तसेच वसतिगृहातील स्ट्रीट लाईट वॉटर पंप, वॉटर प्युरीफायर इ. आवश्यक आहे विद्यार्थ्यीनीना वसतिगृहात निवासी पुरेसा प्रमाणात सुविधा उपलब्ध होण्यासाठी वसतिगृहात विद्युत दुरुस्ती व नुतणीकरणाची कामं करण्यासाठी प्रस्ताव सादर केला आहे. सदर कामाबाबत कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांजकडील खर्चाची अंदाजपत्रके सादर करण्यात आली असून प्रस्तूत कामास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी संदर्भिय २) येथील दिनांक ३१.०७.२०२४ रोजीच्या पत्रान्वये तांत्रिक सहमती प्रदान केली आहे. यास अनुसरुन सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

तेलंग स्मारक मुलींचे वसतिगृह, मुंबई या वसतिगृहातील इमारत दुरुस्ती व नुतणीकरणाच्या कामाकरीता खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे एकूण रु.३३,७६,२१६ /- (अक्षरी रु. तेहतीस लाख शहात्तर हजार दोनशे सोळा रुपये) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजित खर्चाची रक्कम (रु.) |
|---|---|---|
| १ | OW/C/HA/१८५९/२०२२-२३ Providing Renovation to electrical Installation in Canteen Passage blocks (in coordination with proposed Civil works) and to street lights, Water Pumps, water Purifier at Govt. Telang Samarak Girl Hostel Mumbai | १९१७४४३ |

| | | |
|---|---|---|
| | OW/C/HA/१८५९/२०२२-२३ Providing Renovation to electrical Installation of ६२ nos hostel room (in coordination with proposed civil works ) at. Govt. Telang Samarak Girl Hostel Mumbai | १४५८७७३ |
| | Total | ३३७६२१६ |

**२. <u>अटी</u>** :-

१) स्थापत्य कामाच्या पूर्ततेच्या कालावधीतच ढोबळ स्वरुपात गृहीत धरण्यात आलेल्या अनुषंगिक तरतूदींबाबत योग्य नियोजन करुन सविस्तर अंदाजपत्रकानुसारच पुढील कार्यवाही करुन काम हाती घ्यावे.

२) काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाचे संबंधित अधिक्षक अभियंता व मुख्य अभियंता तसेच उपभोक्ता खात्याचे सक्षम अधिकारी यांच्याकडून साक्षांकित करण्यात यावे.

३) सदर कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यता लागणार नाही, यादृष्टीने विशेष दक्षता घेण्यात यावी.

४) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय,क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दिनांक ०७.०७.२०१७ नुसार प्रस्तुत कामाशी संबंधीत मुद्यांची कार्यवाही करावी.

६) प्रस्तुत कामासाठी अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय बांधकाम हाती घेण्यात येऊ नये.

**३.** या कामासाठी होणारा खर्च मागणी क्र.एच-८,४२०२ शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यांवरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०३ विद्यापीठीय व उच्च शिक्षण, (००)(०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२०२ ००७९), ५३ मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**४.** हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक २०/०९/२०१९ चे वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग-पाच महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील अ.क्र.३, परिच्छेद क्रमांक १३४(३) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०२१४१९०११७३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ASHOK SHANKAR MANDE

Digitally signed by ASHOK SHANKAR MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK SHANKAR MANDE
Date: 2025.02.14 19:01:52 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. संचालक,उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,पुणे.
७. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई.
९. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, कोकण विभाग, पनवेल
१०. प्राचार्य, अध्यापक महाविद्यालय, पनवेल
११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१२. वित्त विभाग, व्यय-५, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. नियोजन विभाग, कार्यासन-१४७१, मंत्रालय, मुंबई-३२
१४. सार्वजनिक बांधकाम विभाग, कार्यासन-इमा-३, मंत्रालय,मुंबई-३२.
१५. अवर सचिव (साशि-१/मशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.